**सन २०१८-१९ मध्ये कृषी उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकासअभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत अनुसुचित जाती प्रवर्गाकरिता रुपये ९५०.०० लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.राफअ-२०१८/प्र.क्र.१७६/९-अे**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ जुलै, २०१८

संदर्भ :-

१) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे चे क्र.MSHMPB /MONIT/AAP-२०१८-१९/१७७४/२०१८DT.१३.०४.२०१८ चे पत्र.
२) केंद्र शासनाच्या कृषि , सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे इंग्रजी पत्र क्र.F.No.३३-१७/२०१७-MIDH (AAP), Dated: ०५/०५/२०१८.
३) केंद्र शासनाच्या कृषि ,सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे इंग्रजी पत्रF.No.३३-१७/२०१७-MIDH (APP), Dated: ०७.०५.२०१८.
४) केंद्र शासनाच्या कृषि ,सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे इंग्रजी पत्र F.No.१८-२४/२०१७- MIDH, Dated: २५.०५.२०१८.
५) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे जा.क्र.मराफऔपम/सनि/वाकृआ/प्रशा.मान्यता/२१५५/२०१८, दिनांक ३१.०५.२०१८ चे पत्र.
६) शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्र.राफअ-२०१८/प्र.क्र.१६८/९-अे, दि. ०६/०६/२०१८

प्रस्तावना :-

एकात्मिक फलोत्पादन अभियान ही फळे, भाजीपाला, कंदमुळे, मश्रूम, मसाले, फूल, सुगंधी वनस्पती, नारळ, काजू, कोको आणि बांबू इ.उत्पादनांच्या चतुरस्त्र विकासाकरिता राबविण्यात येणारी केंद्रपुरस्कृत योजना आहे. सदर योजना सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे.

कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान अंतर्गत, राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राज्यात राबविण्यासाठी संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये, अनुसूचित जातप्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा निधी रू. ५७०.००लाख व त्यानुसार राज्यहिश्श्याचा निधी रू. ३८०.०० लाख असा एकूण रू.९५०.००लाख निधी, राष्ट्रीय फलोत्पादन अभियानाच्या अंमलबजावणीकरीता व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:-

एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत केंद्र शासनाच्या कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागाच्या दि. २५.५.२०१८ च्या पत्रान्वये, अनुसूचित जाती प्रवर्गाकरीता वितरित केलेला केंद्र हिश्श्याचा रू. ५७०.०० लाख व त्यानुसार राज्य हिश्याचा ४०% रू. ३८०.०० लाख असा एकूण रू. ९५०.०० लाख, निधी मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीमधून, खर्च करण्यास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पीत निधी केंद्र शासनाने विहित केल्याप्रमाणे सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जनजाती प्रवर्गासाठी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) |
|---|---|---|
| अनुसुचित जाती | मागणी क्र. - डी -०३<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००)(७८९) - अनुसूचित जाती उपयोजना<br>(०३) रोपमळे<br>(००) (०३) -कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (अनुसूचित जाती) (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१A१२७) | मागणी क्र. - डी -०३<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००)(७८९)-अनुसूचित जाती उपयोजना<br>(०३) रोपमळे<br>(००) (०४) - कृषि उन्नती योजना -एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (अनुसूचित जाती ) (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४० टक्के)<br>३३ -अर्थसहाय्य (२४०१A१३६) |

३. सदर अभियानाकरिता वितरित करण्यात आलेला निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर योजनेंतर्गत वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) यांनी शासनास सादर करावे.

५. योजनेअंतर्गत वितरित निधी जिल्हा स्तरावरुन खर्च करण्यात यावा. सदर निधी अनुसूचित जाती व नवबौद्ध घटकांतील लाभार्थ्यांकरिता खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

६. प्रस्तुत आदेश शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २ एप्रिल, २०१८ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत आदेश शासन वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१०२/अर्थसंकल्प, दि. २१/०६/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१२१५१७२७३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.07.12 15:18:28 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रती :-**

१. मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (कृषी) तथा,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे प्रधान सचिव
३. मा. कृषि राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव,
४. सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य,महाराष्ट्र राज्य.
५. मा.प्रधान सचिव, (कृषि व पणन) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,

६. मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
७. मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, नियोजन विभाग/सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई ३२,
८. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,साखर संकुल,शिवाजी नगर,पुणे,
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन मंडळ, पुणे,
११. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. राज्यातील सर्व विभागीय कृषि सह संचालक,
१३. राज्यातील सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१४. विविध राष्ट्रीय मंडळावरील महाराष्ट्राचे सदस्य म्हणून कार्यरत असलेल्या जिल्ह्यातील व्यक्ती,
१५. राज्यातील फळे/फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी,
१६. निवडनस्ती, कार्यासन ९- अे.